# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-०११७/प्र.क्र.७१/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक २७ मार्च २०१७.

**विषय** :- पोलीस आयुक्त, लोहमार्ग, मुंबई यांच्या आस्थापनेवरील टागोर नगर, विक्रोळी (पूर्व) येथील म्हाडाची पोलीस निवासस्थाने, इमारत क्र.१५६ ते १५८, यांची दुरुस्ती व नूतनीकरण करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/२७-बी/२८-बी-२/दुरुस्ती-कार्यक्रम-आढावा /३७१/०९, दिनांक ०४.०७.२०१६.

**ज्ञापन** :-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी, पोलीस आयुक्त, लोहमार्ग, मुंबई यांच्या आस्थापनेवरील, टागोर नगर, विक्रोळी (पूर्व) येथील म्हाडाची पोलीस निवासस्थाने, इमारत क्र.१५६ ते १५८, यांची दुरुस्ती व नूतनीकरण करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी उप-अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग, कुर्ला, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.१,३७,९६,७६४/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे अंदाज अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई यांनी साक्षांकित केले आहे.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते **रु.१,३४,००,१०६/-** असे सुधारित केले आहेत आणि प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, टागोर नगर, विक्रोळी (पूर्व) येथील म्हाडाची पोलीस निवासस्थाने, इमारत क्र.१५६ ते १५८, यांची दुरुस्ती व नूतनीकरण यांबाबतची, उक्त खर्चाच्या अंदाजांमध्ये नमूद केलेली, कामे करण्यासाठी **रु.१,३४,००,१०६/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग- मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (००) (०१), जिल्हा पोलीस बल, (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, या खाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२८/इमा-२, दिनांक ०४.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३२७१७५९३१८९२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.27 18:01:02 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) अपर पोलीस महासंचालक, लोहमार्ग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) पोलीस आयुक्त, लोहमार्ग, मुंबई.
५) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उत्तर मुंबई, मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
९) निवड फाईल (पोल-७).